# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक–पोप्रमा-१०१६/प्र.क्र.६९६/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक १० जुलै २०१७.

**विषय** :- पोलीस मुख्यालय, भंडारा, येथे ५२ शिपाईदल निवासस्थानांमध्ये प्रसाधनगृहे बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ प्रसाधनगृह-बांधकाम-भंडारा, दिनांक १९.०१.२०१६.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस मुख्यालय, भंडारा, येथे ५२ शिपाईदल निवासस्थानांमध्ये प्रसाधनगृहे बांधण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

**२.** उक्त कामासाठी, सहायक अभियंता, श्रेणी-१, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग क्र.-१, भंडारा, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.५०,७२,०००/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भंडारा आणि पोलीस अधीक्षक, भंडारा, यांनी साक्षांकित केले आहेत.

**३.** उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.५०,२७,९७०/-** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

**४.** त्या अनुसार, पोलीस मुख्यालय, भंडारा, येथे ५२ शिपाईदल निवासस्थानांमध्ये प्रसाधनगृहे बांधण्याकरिता **रु.५०,२७,९७०/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१०, मुख्य लेखाशीर्ष, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(०५), महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (योजनांतर्गत), (४०७० ०१५१), ५३, मोठी बांधकामे, या लेखाशी़र्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२६/इमा-२, दिनांक २४.०४.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७२४१५४९१४८७२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.07.24 15:54:33 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक,
महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, नागपूर परिक्षेत्र, नागपूर.
४) पोलीस अधीक्षक, भंडारा.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भंडारा.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८) निवड फाईल (पोल-७).